**कृषी उन्नती योजना - राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (तेलबिया व वृक्षजन्य तेलबिया) अंतर्गत सन २०२०-२१ मध्ये सर्वसाधारण प्रवर्गासाठी पहिल्या हप्त्याचा ₹२३०.०० लाख निधी वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- राअसु-२०२० /प्र.क्र.३८/४अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : २६ ऑगस्ट, २०२०

**संदर्भ:-**

१. केंद्र शासनाचे अभियाना संदर्भात. http://agricoop.nic.in/dacdiviion/dacdiviion/NMOOP२०१४.pdf या संकेतस्थळावर उपलब्ध करुन दिलेल्या मार्गदर्शक सूचना,
२. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६ एप्रिल, २०२०
३. वित्त विभागाचा शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३, दि.०४ मे. २०२०
४. केंद्र शासनाचे पत्र क्र.२-१५/२०२०-NFSM(OS ), दि.१४/०५/२०२०
५. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.राअसु-२०२०/प्र.क्र.३३/४-अे, दि.०६/०६/२०२०
६. कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्र.राअसु-२०२०/प्र.क्र.३३/४-अे, दि.१६/०६/२०२०
७. केंद्र शासनाचे पत्र क्र.१४-१/२०२०-CA-II , दि.१९/०५/२०२०
८. केंद्र शासनाचे पत्र क्र.१४-१/२०२०-CA-II , दि.०१/०६/२०२०
९. कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.वि.प्र.२/राअसु(गळीत)२०-२१/पुनर्जि.वि.मा/प्र.क्र.०६/१९/१४३५२, दि.१६/०६/२०२०
१०. शासन निर्णय क्रमांक :-राअसु-२०२० /प्र.क्र.३८/४अे, दि.२१.०७.२०२०.
११. शासन निर्णय क्रमांक :-राअसु-२०२० /प्र.क्र.३८/४अे, दि.१३.०८.२०२०.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०१९-२० मध्ये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत (गळीतधान्य व तेलताड) अभियान राबविण्यासाठी संदर्भ क्र.४ येथील दि.१४/०५/२०२० च्या पत्रान्वये रु.६४०३.०६ लाख (केंद्र हिस्सा रु.३८६७०८२ लाख व राज्य हिस्सा रु.२५३५.२२ लाख) एवढया रकमेचा वार्षिक कृती आराखडा मंजूर केला आहे. तथापि वित्त विभागाच्या दि.०४ मे. २०२० च्या शासन निर्णयाच्या अनुषंगाने PFMS खात्यातवरील शिल्लक रक्कम व उपलब्ध अर्थसंकल्पीत तरतुदीच्या ३३ टक्के च्या मर्यादेत संदर्भ क्र.५ व ६ येथील अनुक्रमे दि.०६/०६/२०२० व दि.१६/०६/२०२० च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे.

केंद्र शासनाने संदर्भ क्र.७ व ८ येथील दिनांक १९/०५/२०२० व दि.०१/०६/२०२० च्या पत्रान्वये राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (तेलबिया व वृक्षजन्य तेलबिया) अंमलबजावणीसाठी पहिल्या हप्त्याचा

तीन्ही प्रवर्गाकरिता एकूण रु.१९०५.०० लाख निधी मुक्त केला आहे. आयुक्तालयाने संदर्भ क्र.९ येथील पत्रान्वये प्रस्तावित केल्याप्रमाणे केंद्र हिस्स्याचा रु.२२१.५९३ लाख निधी त्या समरुप राज्य हिस्याचा ₹१४७.७२८ लाख असा एकूण ₹३६९.३२१ लाख वितरीत करण्याबाबत प्रस्ताव सादर केला होता, तथापि वित्त विभागाने अर्थ संकल्पीय तरतूदीच्या ५ % मर्यादेत निधी वितरणास मान्यता दिली आहे, त्या अनुषंगाने यापूर्वीचे संदर्भ क्रमांक १० व ११ येथील निधी वितरणाचे आदेश अधिक्रमित करुन लेखाशिर्ष अंतर्गत उपलब्ध निधी नुसार सन २०२०-२१ करीता कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत (तेलबिया) राज्यात राबविण्यासाठी सर्वसाधारण प्रवर्गासाठी केंद्र व राज्य हिस्स्याचा मिळून एकूण ₹२३०.०० (रुपये दोन कोटी तीस लाख फक्त) निधीच्या वितरीत करण्याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे -

**शासन निर्णयः**

१. सन २०२०-२१ करीता कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान अंतर्गत (तेलबिया) राज्यात राबविण्यासाठी **सर्वसाधारण प्रवर्गासाठी** केंद्र व राज्य हिस्स्याचा मिळून एकूण **₹२३०.०० (रुपये दोन कोटी तीस लाख फक्त)** निधीच्या वितरणास मान्यता देण्यात येत आहे.सदर निधीपैकी केंद्र व राज्य हिस्साच्या निधीचे विवरण पुढीलप्रमाणे-

**(₹ लाख)**

| **राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (तेलबिया व तेलताड)** | **सर्वसाधारण प्रवर्ग** | | **एकूण** |
|---|---|---|---|
| | **केंद्र हिस्सा (६०%)** | **राज्य हिस्सा (४० %)** | |
| **अभियान क्र.१ (तेलबिया)** | १३८.०० | ९२.०० | २३०.०० |

२. परिच्छेद-१ मध्ये नमूद केल्यानुसार **अभियान-१ (तेलबिया)** करिता केंद्र हिश्श्याचा ₹१३८.०० लक्ष निधी (अक्षरी रुपये एक कोटी अडतीस लाख फक्त) आणि राज्य हिस्स्याच्या ₹९२.०० लक्ष निधी (अक्षरी रुपये ब्याण्णव लाख फक्त) असा एकूण ₹२३०.०० (अक्षरी रुपये दोन कोटी तीस लाख फक्त) निधी वितरीत करण्यात येत आहे.

३. परिच्छेद-१ ते २ मध्ये नमूद केल्यानुसार, **अभियान-१ (तेलबिया)** करिता अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीद्वारे वितरीत केलेला केंद्र निधी सन २०२०-२१ मध्ये पुढील लेखाशिर्षाखालील अर्थसंकल्पीय तरतुदीतून खर्ची टाकावा:-

| **केंद्र हिस्सा** | **राज्य हिस्सा** |
|---|---|
| मागणी क्रमांक डी-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००) (१०२) अन्नधान्य पिके<br>(००) (२५) कृषी उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके<br>(केंद्र हिस्सा ६०%) (केंद्र पुरस्कृत योजना) (२४०१ ४६१४)(योजनांतर्गत) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य | मागणी क्रमांक डी-३<br>२४०१- पीक संवर्धन<br>(००) (१०२) अन्नधान्य पिके<br>(००) (३३) कृषी उन्नती योजना- राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान-अन्नधान्य पिके<br>(राज्य हिस्सा ४०% ) (केंद्र पुरस्कृत योजना) (२४०१ A२३४) (योजनांतर्गत) (दत्तमत)<br>३३, अर्थसहाय्य |

४. सन २०२०-२१ मध्ये राज्यात सदर अभियानाची अमंलबजावणी व सनियंत्रण करण्याच्या दृष्टीने निधी आहरण व वितरण करणेसाठी पुढीलप्रमाणे नियंत्रण तसेच आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **स्तर** | **नियंत्रण अधिकारी** | **आहरण व संवितरण आधिकारी** |
|---|---|---|---|
| १ | आयुक्तालय स्तर | आयुक्त (कृषि), कृषी आयुक्तालय, पुणे | सहाय्यक संचालक (लेखा-१) कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे. |
| २ | जिल्हा स्तर | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी | संबंधित जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी कार्यालयातील लेखाधिकारी |

५. शासन निर्णयान्वये कृषी उन्नती योजना-राष्ट्रीय अन्न सुरक्षा अभियान (तेलबिया) करिता उपलब्ध करुन देण्यात येणाऱ्या केंद्र व राज्य हिस्स्याच्या ₹२३०.०० लक्ष रक्कमेचे जिल्हा निहाय/ कार्यालय निहाय वाटप करण्याकरिता संचालक (विस्तार व प्रशिक्षण) यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांनी अभियानांतर्गत जिल्हा निहाय वाटप करावयाचा निधी PFMS प्रणालीद्वारे सर्व संबंधित जिल्हयांना वितरीत करावा.

६. सदर निधी खर्च करताना संदर्भ क्र.१ येथील अभियानाच्या मार्गदर्शक सूचना व संदर्भ क्र.५ व ६ येथील दि.०६/०६/२०२० व दि.१६/०६/२०२० च्या शासन निर्णयातील अटी, शर्ती व विहित कार्य पध्दतीचे कटाक्षाने पालन करण्यात यावे.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६ एप्रिल, २०२० नुसार विहीत केलेल्या अटींची पुर्तता होत असल्याने तसेच, सदर परिपत्रकानुसार या विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १३६/२०२०/व्यय-०१, दि.०३.०८.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेने निर्गिमित करण्यात येत आहे.

९.    सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८२६१८०५०४११०१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

ZENDAGE MAHAVEER BALASAHEB

Digitally signed by ZENDAGE MAHAVEER BALASAHEB
DN: c=IN, st=Maharashtra,
2.5.4.20=a9503a5209c984c11d292912b642bdfd32282e4276fb5541f4f92f23c
b110d23, postalCode=400032, street=MADAM CAMA
ROAD,MANTRALAYA,MUMBAI,
serialNumber=43d7bb272129cd1382853268481cb2ceee1f236d393acecb710
84bc36ffeed02, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=ZENDAGE
MAHAVEER BALASAHEB
Date: 2020.08.26 18:17:27 +05'30'

**( महावीर झेंडगे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति:-**

१. मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.
२. मा. राज्य मंत्री (कृषि) यांचे स्वीय सहायक ,मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानसभा ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई
४. मा.विरोधी पक्ष नेता ,विधानपरिषद ,विधानमंडळ सचिवालय ,मुंबई
५. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
७. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग ,मंत्रालय, मुंबई
८. सचिव (कृषि) ,कृषि व पदुम विभाग ,मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त (कृषी), कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०.व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळ, अकोला.
११.संचालक (विस्तार व प्रशिक्षण), कृषी आयुक्तालय, साखर संकुल, शिवाजीनगर, पुणे.
१२.सर्व विभागीय कृषी सहसंचालक
१३.सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी
१४.महालेखाकार ( स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा), मुंबई.
१५.महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१६.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपुर
१७.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी, महाराष्ट्र राज्य
१८.सहायक संचालक (लेखा-१), कृषी आयुक्तालय, पुणे
१९.वित्त विभाग (कार्या. व्यय-१ / अर्थसंकल्प - १३), मंत्रालय, मुंबई
२०.निवड नस्ती-४अे.